**पश्चिम क्षेत्रीय परिषदेच्या बैठकीस झालेल्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पक्षेप-२०२४/प्र.क्र.६४/कार्या-जपुक (२९)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २१ मार्च, २०२५.

वाचा:- शासन निर्णय क्रमांक: पक्षेप-२०२४/प्र.क्र.६४/कार्या-जपुक (२९), दि.०९ सप्टेंबर, २०२५.

**प्रस्तावना:-**

केंद्रीय गृहमंत्री, भारत सरकार, नवी दिल्ली हे पश्चिम क्षेत्रीय परिषदेचे अध्यक्ष असतात. सदर समितीमध्ये महाराष्ट्रासह गुजरात, गोवा या राज्यांचा तसेच दादरा नगर हवेली, दीव-दमण या केंद्रशासित प्रदेशांचा समावेश आहे. सदर समितीच्या बैठकीचे यजमान पद चक्राकार पध्दतीने संबंधित राज्यांमध्ये वाटप करण्यात येते. पश्चिम क्षेत्रीय परिषदेच्या २७ व्या बैठकीचे यजमान पद महाराष्ट्र राज्याकडे आले आहे. या पश्चिम क्षेत्रीय परिषदेची २७ वी बैठक दिनांक २२ फेब्रुवारी, २०२५ रोजी पुणे येथे आयोजित करण्यात आली होती. ज्या राज्यास यजमानपद लाभले असेल त्या राज्याचे मुख्यमंत्री हे उपाध्यक्ष व अन्य दोन मंत्री हे सदस्य असतात. सदर परिषदेसाठी केंद्रीय गृहमंत्री, महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री व दोन्ही उपमुख्यमंत्री बैठकीस उपस्थित होते. तसेच सदर बैठकीसाठी संबंधित राज्यातील व केंद्रशासित प्रदेशातील मुख्यमंत्री, मंत्री, मुख्य सचिव व वरिष्ठ अधिकारी असे अतिमहत्वाचे अतिथी उपस्थित होते. पुणे येथे आयोजित केलेल्या पश्चिम क्षेत्रीय परिषदेच्या २७ व्या परिषदेच्या बैठकीची व्यवस्था करण्यासाठी जिल्हाधिकारी, पुणे यांना समन्वय अधिकारी म्हणून नेमण्यात आले होते. सदरची बैठक योग्य रितीने पार पडली असून, जिल्हाधिकारी, पुणे यांनी बैठकीसाठी झालेल्या रु.२,०४,३६,९०५/- इतक्या खर्चाचा अंतिम तपशील सादर केला आहे. सदर खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पश्चिम क्षेत्रीय परिषदेची २७ वी बैठक दिनांक २२ फेब्रुवारी, २०२५ रोजी पुणे येथे आयोजित करण्यात आली होती. सदरची बैठक योग्य रितीने पार पडली असून, जिल्हाधिकारी, पुणे यांनी सादर केलेल्या रु.२,०४,३६,९०५/- इतक्या खर्चाच्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. पश्चिम क्षेत्रीय परिषदेची बैठक आणि पश्चिम क्षेत्रीय परिषदेच्या स्थायी समितीच्या बैठकीचा खर्च भागविण्यासाठी मागणी क्र.ए-०४, मुख्य लेखाशीर्ष २०५२- सचिवालय सर्वसाधारण सेवा, (०९०)- सचिवालय, (००) (०१) सामान्य प्रशासन विभाग (अनिवार्य), २०५२००२५ अंतर्गत १३- कार्यालयीन खर्च अंतर्गत पावसाळी अधिवेशन २०२४ मध्ये रु.२.५० कोटी इतक्या रकमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आलेली आहे.

पश्चिम क्षेत्रीय परिषदेच्या १४ व्या स्थायी समितीची बैठक दिनांक ०२ ऑगस्ट, २०२४ रोजी नाशिक येथे पार पडली आहे. सदर बैठकीवर झालेल्या रु.४४,२३,२३५/- इतक्या खर्चास संदर्भाधीन दिनांक ०९.०९.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

पश्चिम क्षेत्रीय परिषदेची २७ वी बैठक दिनांक २२ फेब्रुवारी, २०२५ रोजी पुणे येथे पार पडली आहे. सदर बैठकीवर झालेल्या रु. २,०४,३६,९०५/- इतक्या खर्चाची प्रतिपूर्ती करणे आवश्यक आहे. सद्य:स्थितीत वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर रु.१,८०,५९,४०५/- इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिला असून, सदर निधी वितरणास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. उर्वरित रु.२३,७७,५००/- इतका निधी वित्त विभागाकडून उपलब्ध करुन घेण्यात येत असून निधी उपलब्ध होताच वितरीत करण्यात येईल.

३. कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-२६ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, निधी वितरण करण्याची तसेच महालेखापाल यांच्या लेख्याशी खर्च ताळमेळ करण्याची कार्यवाही करावी.

४. सदरचा निधी जिल्हाधिकारी, पुणे यांच्या नावे अदा करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

५. जिल्हाधिकारी, पुणे यांनी सदरचा निधी खर्ची टाकून त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ सादर करण्याची कार्यवाही करावी.

६. सदर खर्च “मागणी क्र.ए-०४, मुख्य लेखाशीर्ष २०५२- सचिवालय सर्वसाधारण सेवा, (०९०)- सचिवालय, (००) (०१) सामान्य प्रशासन विभाग (अनिवार्य), २०५२००२५ अंतर्गत १३- कार्यालयीन खर्च अंतर्गत” या लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्रमांक-४, परिच्छेद-२७ (२) मधील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराच्या मर्यादेत निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौस ४५८/व्यय-४, दिनांक ०१.०८.२०२४ व अनौस १७३ /व्यय-४, दिनांक २१.०२.२०२५ च्या अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०३२११७४७१३०९०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SACHIN RAMESHCHANDRA KAWALE

Digitally signed by SACHIN RAMESHCHANDRA KAWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=d5062265900a410830ee382e5139a604fd984b2281b2e3afd10a6632fad19eb9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6A24065CA2F124D0C76C59FC9F7EEF1AEB64319AF10327AEE4A11A35BB49E2B7, cn=SACHIN RAMESHCHANDRA KAWALE
Date: 2025.03.21 17:54:06 +05'30'

**(सचिन र. कावळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, (का.क्र.२६ मार्फत)
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा) महाराष्ट्र ,मुंबई

३) कार्यासन अधिकारी,सामान्य प्रशासन विभाग,(कार्या-२६)
४) जिल्हाधिकारी, पुणे
५) सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन- अर्थसं (२५), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
६) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-४/ अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती / कार्यासन - जपुक (२९.)